## माझी पेंटिंग आणि विचार

# वासुदेव कामत



ज्योत्स्ना प्रकाशन





प्रकाशक : मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी' ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग, १६२ ज. शंकरशेट मार्ग,
गिरगाव, मुंबई ४००००४



पहिली आवृत्ती : सप्टेंबर २०१४

मुद्रक : युनिक ऑफसेट, नऱ्हेगाव, पुणे ४११०४१

**मूल्य १२५ रुपये**

ISBN 978-81-7925-399-1

## संकल्पना साकार

'तुम्ही आर्टिस्ट म्हणजे नेमकी कोणत्या प्रकारची पेंटिंग करता?' असे कुणी विचारले असता मी सांगतो, 'मी पोर्ट्रेट पेंटर आहे, मी लॅन्डस्केप पेंटर आहे, माझी काही पेंटिंग कन्सेप्च्युअल आणि सब्जेक्टिव्ह असतात...' यानंतर 'रिॲलिस्टिक की ॲब्स्ट्रॅक्ट' असा पुढचा प्रश्न त्यांच्याकडे तयार असतो. 'होय, माझी पेंटिंग रिॲलिस्टिक स्टाईलमध्ये बसणारी आहेत.' या प्राथमिक संवादातून चित्रकलाविषयी चर्चा सुरू होते; आणि प्रश्नकर्त्याचा कल ॲब्स्ट्रॅक्ट आर्टकडे झुकणारा असेल तर 'पेंटिंग कशाला म्हणावे', 'चित्रकलेची मापदंडे कोणती', याची सारवासारवीची व्याख्या दोन्ही बाजूने मांडली जाते. आज तरी आधुनिक कलाजगतात पोर्ट्रेट आणि लॅन्डस्केप पेंटिंगला अभिजात कलेचा दर्जा नसल्याचे बोलले जाते. त्यामुळे ओघानेच रिॲलिस्टिक किंवा रिप्रेझेंटेशनल आर्ट आणि ॲब्स्ट्रॅक्ट आर्ट यांच्यामधून काहीशी ठळक होत जाणारी सीमारेषा आखली जाते.

एखाद्या व्यक्तीचे पोर्ट्रेट करणे, समोरील दृश्याचे निसर्गचित्र रंगवणे, वस्तुचित्र काढणे आणि हे सर्व वास्तववादी शैलीत बसणारे असले म्हणजे केवळ 'जसे आहे तसे' किंवा 'जसे दिसते तसे' अनुकरण चित्रे आहेत; यात क्रिएटिव्हिटी किंवा नवनिर्मितीचा गुण अभावानेच असतो, असे आधुनिक कला विचारवंतांचे आणि समीक्षकांचे म्हणणे आहे. अशा वेळी वास्तववादी कलानिर्मितीचे कौशल्य दुय्यम ठरते आणि या शैलीत काम करणाऱ्या कलाकारांच्या मनात निराशेचा न्यूनगंड तयार होतो, ही अधोरेखित वस्तुस्थिती आहे.

भिन्न विचारांच्या चर्चा-परिसंवादातून अनेक प्रश्नांची उकल होते. जरी एखाद्या प्रश्नाचे उत्तर मिळाले तरी समाधान होईलच याची खात्री नसते. कारण समाधान बहुतांशी अनुभवाशी निगडित असते. हा अनुभव ज्याला त्याला कृतीतून मिळालेला असतो. प्रत्यक्ष कृतीतून मिळालेल्या अनुभवाबद्दल आपले प्रामाणिक मत असते.

खरे पाहता, कलाकृतीची अभिजातता ही रिॲलिस्टिक आणि ॲब्स्ट्रॅक्ट शैलीच्या वेगळेपणाने किंवा एकतर्फी दृष्टिकोन ठेवून अन्य प्रकारांतील उणिवा आणि दोष दाखवून ठरवता येणार नाही. त्या-त्या कलाकृतीच्या निर्मितीचा उद्देश, प्रक्रिया आणि अंतिम उपलब्धता यांचा अभ्यास होणे आवश्यक आहे. सर्वच कलाकृतींची ऐतिहासिक नोंद आणि माहिती उपलब्ध नसली तरी त्यांच्या दृश्य जाणिवांचा आपणास अभ्यास करता येतो.

वास्तववादी शैलीत काम करण्यासाठी अचूक रेखांकन, प्रमाणबद्धता, पर्स्पेक्टिव्ह, माध्यमाची हाताळणी आणि त्यावरील प्रभुत्व, हे दीर्घकाळ केलेल्या अभ्यासाने साध्य होते हे सर्वमान्य आहे. चांगले फिगर ड्रॉइंग, चांगले पोर्ट्रेट पेंटिंग करता येणे, तसेच निसर्गचित्र रंगवता येणे ही सरावाने साध्य झालेली आपली उपलब्धी आहे. परंतु, समोर दिसणाऱ्या गोष्टींचा वस्तुनिष्ठ अभ्यास केवळ अनुकरणापुरता मर्यादित न ठेवता कलाकार स्वतःच्या विचाराने अभूतपूर्व कलानिर्मिती निर्माण करतो. ते त्याचे स्वतंत्र योगदान असते. आपण बाह्यजगात जे काही पाहतो, अनुभवतो त्यापेक्षाही अधिक मोठे विश्व आपल्या अंतर्मनात सामावलेले असते. ते अप्रकट विश्व कलाकार कलाकृतीच्या रूपात साकार करत असतो. ही प्रस्तुती वास्तववादी किंवा केवलाकारी किंवा विरूपित अशी कोणत्याही स्वरूपाची असू शकते. परंतु त्याचा बरेवाईटपणा प्रथम कलाकाराच्या स्वतःच्या समाधानावर अवलंबून असतो.

आधुनिक कला ज्याला सर्वसामान्य परिभाषेत मॉडर्न आर्ट म्हणतात, तो चित्रप्रकार पूर्णतया ॲब्स्ट्रॅक्ट असावा किंवा त्यात येणारे आकार, मनुष्याकृती किंवा वस्तूंचे आकार विरूपीकरण (Distorted) केलेले असावेत का असा प्रश्न कलेच्या विद्यार्थ्यांपासून ते अनेक कलाकार आणि आस्वादकांनादेखील पडलेला आहे. त्यामुळे हल्लीचा 'ट्रेंड' म्हणून कलाकार स्वतःच्या आवडीला मुरड घालून दृश्यकलानिर्मितीच्या प्रामाणिक

अभिव्यक्तीला मुकतात. असे असेल तर कलाकाराची ही अंतर्मुख अवस्था नसून बहिर्मुख स्थितीशी केलेली तडजोड म्हणावी लागेल. कलाकाराने आपल्या विचारांचे कलाकृतीद्वारे केलेले मूर्त प्रकटीकरण ही त्याची अभिजात निर्मिती असते. मग ते वास्तववादी, केवलाकारी किंवा आणि कोणत्याही स्वरूपात असेल.

१८५७ साली सर जे. जे. कलामहाविद्यालयाची स्थापना झाली. तेव्हापासून आपल्याकडे व्यक्तिचित्रण, पूर्ण मनुष्याकृतींचे अभ्यासपूर्ण (Academic) रेखांकन यांचा पाश्चात्त्य पद्धतीचा अभ्यासक्रम सुरू झाला. तो थोड्याफार फरकाने आजही चालू ठेवला आहे. पूर्वी व्यक्तिचित्रण, वस्तुचित्र याबरोबरच पौराणिक, ऐतिहासिक आणि दैनंदिन जीवन प्रसंगांवर आधारित मानवाकृतींची रचनाचित्रे (Figurative Compositions) रंगवली जात. पुढे पुढे नवकलेचे प्रयोग आणि मुक्त विचारसरणीच्या अंगीकारातून विभिन्न शैली आणि इझमच्या प्रवाहापुढे वास्तववादी शैलीची कलानिर्मिती खुंटली. याचा परिणाम असा दिसून आला, की अशा पद्धतीने काम करण्यासाठी करावा लागणारा सराव आणि मेहनत म्हणजे यात नावीन्य आणि सृजनशीलता यांचा अभाव असा गैरसमज कलाक्षेत्रात रुजवला गेला. त्यामुळे मानवाकृतींच्या रचनाचित्रांना बोधचित्रे (Illustrations) मानले जाऊन ते 'पेंटिंग' नव्हे असे समजले जाऊ लागले. अशा चित्रांमधील विषय आणि आशय यांकडे दुर्लक्ष करून ही केवळ क्राफ्टस्मनशीप आहे, अशा प्रकारची बेधडक विधाने केली जाऊ लागली. अशा चित्रांतील बारकावे, तपशील, अचूकता दाखवताना कलाकार आपल्या कारागिरीचे कौशल्य पणाला लावतो. परंतु चित्रांतील रचना, रंगसंगती, आणि त्यातला आशय मूर्त स्वरूपात आणण्याकरता त्याला अभ्यासपूर्ण कुशलताही दाखवावी लागते, हा त्याच्या प्रतिभेचा आविष्कार असतो. इथे आपली 'कारागिरी' दाखवणे हा चित्रकाराचा हेतू नसतो. वास्तववादी किंवा यथार्थवादी शैलीत चित्र-शिल्पनिर्मिती केल्याने कलाकृतीच्या रचना कौशल्याला कमीपणा येत नाही.

कलेच्या इतिहासात कालक्रमाने नवनवे प्रयोग आणि बदल झालेले आपण पाहतो. त्यानुसार वेगवेगळ्या 'इझम'ची वर्गवारी आखली गेली. मात्र कलाकाराने स्वतःला 'इझम'च्या कुंपणात बसवून कलाकृती निर्माण केली नाही. निर्मिती अगोदर होते आणि त्यानंतर त्याला 'इझम'ची चौकट प्राप्त होते. वरील विचारांना अनुसरून माझी स्वतःची कलानिर्मिती माझ्या संकल्पनात्मक चित्रातून व्यक्त करण्याचा मी प्रयत्न करू लागलो. या प्रक्रियेत एक विशिष्ट नियमावली आखलेली आहे. ही केवळ माझ्या वैयक्तिक सोयीकरता नसून सर्वच अभिजात कलानिर्मितींना लागू पडते.

अभिजात कलानिर्मितीचे तीन सोपान आहेत. १) निरीक्षण २) चिंतन आणि ३) प्रत्यक्ष कृती किंवा निर्मिती.

### निरीक्षण

आपण जे पाहतो, ऐकतो, वाचतो किंवा प्रत्यक्ष अनुभव घेतो त्याची आपल्या मनाने घेतलेली विचारपूर्वक दखल म्हणजे निरीक्षण. या निरीक्षणाला सत्याचा आधार असतो. ते खरे ज्ञान असते. ज्ञानेंद्रियांनी घेतलेली नोंद निरीक्षणाच्या चौकटीत समाविष्ट असते.

### चिंतन

निरीक्षणाला चिंतनाने अर्थ प्राप्त होतो. चिंतनानेच चूक-बरोबर, योग्य-अयोग्य अशा त्या-त्या विषयाच्या अर्थगर्भाची व्याप्ती वाढते. अनुभवाला निरीक्षणाचा आणि सत्याचा आधार असतो. आणि चिंतनाला स्वतःच्या विचारांची आणि प्रतिक्रियेची जोड असते. या चिंतनातूनच कलाकृतींची अप्रकट संकल्पना आपल्या मनात आकार घेत असते.

### प्रत्यक्ष निर्मिती

एखाद्या गोष्टीचे केलेले निरीक्षण आणि मनात चाललेले चिंतन याला प्रत्यक्ष कृतीची जोड मिळाली म्हणजे त्याचे मूर्त स्वरूप कलाकाराला आणि रसिकाला अनुभवता येते. म्हणूनच प्रत्येक अभिजात कलाकृतीच्या निर्मितीमध्ये या तीनही पायऱ्या महत्त्वाच्या आहेत. विचारांना मूर्त रूप देणारे माध्यम हे साधन असते. शब्द, चित्र-शिल्प वस्तू, किंवा अभिनयासाठी शरीर ही सर्व साधने आहेत. कलानिर्मितीसाठी साधनांची हाताळणी आणि सातत्यशील सराव हादेखील तितकाच महत्त्वाचा आहे. संकल्पना नेमकेपणाने साकार करण्यात, साधनांवरचे प्रभुत्व आणि कुशलता यांची महत्त्वाची भूमिका असते.

पहिल्या दोन पायऱ्यांपैकी एखादी जरी वगळली तर कलाकृतीची अभिजातता क्षीण होऊ लागते. उदाहरणार्थ, केवळ निरीक्षणाला अनुसरून केलेली कृती चिंतनाची जोड नसल्यास अनुकरण ठरेल. तसेच निरीक्षणाच्या अनुभूतीशिवाय केवळ काल्पनिक कृतीला सत्याचा आधार राहणार नाही. आणि केवळ निरीक्षण आणि चिंतन हे कृतीशिवाय कलाकृतीच्या मूर्त रूपात साकारच होणार नाही.

आपल्या विचारांना भाषा असते. आपण नेहमी आपल्याला अवगत असलेल्या भाषेतून विचार करत असतो. तसेच आपल्या

मनःपटलावर त्या-त्या विचारांचे दृश्य स्वरूप सरकत असते. विचारांची आणि चिंतनाची तीव्रता जशी असेल तशी त्या दृश्याची स्पष्टता आपल्याला जाणवत असते. कलाकार त्या कल्पनेला कलाकृतीद्वारे अभिव्यक्त किंवा साकार करत असतो. चित्राची दृश्य भाषा विश्वात्मक आहे. या भाषेला लेखी किंवा बोलीभाषेप्रमाणे भौगोलिक आणि मानवनिर्मित राजकीय सीमारेषा नसते.

चित्र समजून घेण्यासाठीही कलाक्षेत्राचे साहचर्य आणि त्याचा आस्वादपूर्ण अभ्यास आवश्यक असतो. कलेविषयी रुचीही बाळगावी लागते.

चित्र कळावे म्हणून त्याला शीर्षक किंवा विषय असेलच असे नाही. काही वेळा 'Untitled' चित्रदेखील परमावधीचा आनंद देते. चित्राचे शीर्षक चित्राला पूरक असले तरी चित्राचा दृश्य परिणामच खरा अधिक महत्त्वाचा आहे.

चित्रनिर्मितीचे तीन सोपान आपण लक्षात घेतले तसेच कलाकृतीच्या आस्वादाच्याही तीन पायऱ्या सांगता येतील. एखादे चित्र पाहिल्यावर केवळ दृश्यानुभव जाणवतो. केवळ पाहिले म्हणजे बरेवाईट, आनंद किंवा समाधान झाले हा एक प्रकार. दुसरा प्रकार म्हणजे चित्र पाहिल्यावर पाहणाऱ्याच्या बुद्धीला किंवा विचारांना



'At last I got it!', Oil on canvas 24" x 30"

चालना मिळते. चित्राचा विषय, रंग, रचना, तंत्र, कौशल्य वगैरे तपशीलवार तो विचार करू लागतो. तिसऱ्या प्रकारात एखादी कलाकृती पाहिल्यावर ती मनाला किंवा हृदयाला भिडते. इथे विचारांना चालना मिळतेच, शिवाय त्या कलाकृतीचा प्रभाव दीर्घकाळ मनावर बिंबून राहतो. मात्र या तीन प्रकारांच्या आधारे कलाकृतीच्या दर्जाची वर्गवारी केली जाऊ नये; कारण प्रत्येक कलाकाराच्या कलानिर्मितीत हे तीनही प्रकार अंतर्भूत असतात.

एखाद्या कलाकाराने स्वतःच्या कलानिर्मितीबद्दल बोलताना 'मला वाटले म्हणून मी हे चित्र काढले!' किंवा 'मला जे आवडते ते मी करतो' असे म्हणून थोडक्यात समर्थन केले की प्रश्नकर्त्याला काही विचारताच येणार नाही. कलाकाराने आपल्याला पटणारे आणि आवडणारे विषय साकार करणे हे अगदी योग्य आहे. याबरोबरच त्या निर्मितीमागची प्रेरणा, कार्यपद्धती ही कलाकाराच्या शब्दांत व्यक्त झाल्यावर तो आस्वादकांसाठी अभ्यासाचा विषय होतो. याच आधारावर कलाशाळांमध्ये चित्रकलेचा अभ्यासक्रम आखला जातो.

आज भारतातील सर्वच प्रांतांच्या तुलनेत महाराष्ट्रात सर्वांत जास्त आर्ट स्कूल आहेत. त्यात स्केचिंग, स्टिल लाइफ, फिगर ड्रॉइंग, पोर्ट्रेट पेंटिंग, क्रिएटिव्ह पेंटिंग, कॉम्पोझिशन असे अनेक विषयांचे अभ्यासक्रम आखलेले असतात. यात यथार्थवादी विषयांबाबत विद्यार्थ्यांना फारशी शंका नसते. सातत्यशील सरावाने या विषयांमध्ये प्रगती साधता येते. परंतु कॉम्पोझिशन, क्रिएटिव्ह पेंटिंग, जान्र पेंटिंग वगैरेबाबत बहुसंख्य विद्यार्थ्यांचा नेहमी गोंधळ असतो. अनेक वेळा विद्यार्थ्यांशी चर्चा करताना 'आमचे कॉम्पोझिशन जरा कमकुवत (Weak) आहे, त्यासाठी काय करावे?' असा प्रश्न असतो. मी स्वतः विद्यार्थी असताना माझ्याही मनात ही संभ्रमावस्था होती. ज्या चित्रप्रकाराला कॉम्पोझिशन, क्रिएटिव्ह पेंटिंग म्हणतात, किंवा सर्वसामान्य भाषेत ज्याला कन्टेम्पररी आर्ट वा मॉडर्न आर्ट म्हणतात, ते नेमके काय असा मला प्रश्न पडे.

खरे पाहता ज्याला आपण कॉम्पोझिशन म्हणजेच रचना कौशल्य म्हणतो ते केवळ क्रिएटिव्ह पेंटिंगपुरतेच लागू नसते. कॉम्पोझिशन हा सर्वच कलांचा 'प्राण' आहे. कोणत्याही कलाकृतीत कॉम्पोझिशन चांगले नसेल तर ती निस्तेज होते.

कलाकृती वास्तववादी असो किंवा केवलाकारी, ती मुख्यतः कॉम्पोझिशनमुळेच आकर्षक ठरते. हे लक्षात आले तरी क्रिएटिव्ह पेंटिंग शिकताना कोऱ्या कागदावर चित्रविषयाचे स्पष्ट स्वरूप साकार करता येत नसे. कारण समोर दिसते त्यावरून चित्र रंगवण्यापेक्षा एखादी संकल्पना विचारपूर्वक परंतु सहजपणे चित्रातून व्यक्त करणे

काही जमेना. जर काही प्रयत्न केलाच तर ते चित्र फिगर ड्रॉइंग किंवा लॅन्डस्केपकडे झुकत जाई. किंवा फार तर ते कथाचित्रासारखे होई. इतका वास्तववादी शैलीचा माझ्या निर्मितीवर पगडा होता; किंबहुना तो सहजपणे झुगारून द्यावा असे आजही मला वाटत नाही. जमत नाही तर पूर्वसुरींच्या एखाद्या कलाकाराच्या शैलीचे अनुकरण करून आपली निर्मिती त्या इझममध्ये बसवावी असेही मनाला पटत नव्हते. अभ्यासक्रमाचा भाग म्हणून आर्ट स्कूलमध्ये शिकताना साल्वादोर दालीच्या आणि तत्सम अतिवास्तववादी (Surrealistic) कलाकारांच्या चित्रशैलीचा प्रभाव काही काळ माझ्यावर होता हे मी नाकारत नाही. कारण आपल्याकडे असलेल्या कौशल्याचा वापर आपण संकल्पना चित्रांना साकार करण्यासाठी करू शकतो हा मला त्या वेळी थोडासा दिलासा मिळाला होता. आर्ट स्कूलच्या शेवटच्या वर्षी 'My Dream' या चित्राला वार्षिक कलाप्रदर्शनात सुवर्णपदक मिळाले होते. या अतिवास्तववादी शैलीत आतापर्यंत १५-२० चित्रे रंगवली असतील; परंतु मी त्यात गुंतून पडलो नाही.

माझ्या चित्रांचे विषय भारतीय विचारसरणीचा प्रभाव असणारे असल्याने केवळ स्वप्नसदृश फॅन्टसी रंगवण्यापेक्षा आपल्यावरच्या संस्काराशी निगडित असलेली जाणीव माझ्या चित्रांसाठी कारण बनू लागली. त्यामुळे चित्रातील विषयात निवेदनाबरोबर कथाबोध दर्शवणारी चित्रे मी रंगवू लागलो. एखाद्या विषयाचा अभ्यास आणि चिंतन करून चित्र साकारण्यात मला अधिक आनंद आणि समाधान मिळते. अशा अनेक विषयांची आणि अनुभवांची जंत्री आपल्या मनात साठवलेली असते. त्यातल्या एखाद्या विषयाचा सर्वांगाने अभ्यास आणि चिंतन करून त्यावर आधारलेली चित्रांची मालिका शोधप्रबंधासारखी साकार होते. त्या चित्रांमधून व्यक्त होणारी परिपक्व अनुभूती रसिकांपर्यंत संक्रमित होत असते.

आतापर्यंत असे वेगवेगळे विषय घेऊन 'संकल्पना चित्रांची' मालिका मी रंगवत आलो. या चित्रांतून विशिष्ट बोध-प्रत्यय देण्याचा मी प्रयत्न केला आहे. म्हणून मी या चित्रांना 'बोधचित्रे' असेही म्हटले आहे. प्रदर्शनातली मालिका २५ ते ३० चित्रांची असली तरी त्या-त्या विषयांना अनुसरून येणारी अनेक चित्रे पुढेही रंगवली गेली. ही सर्व चित्रे वास्तववादी शैलीशी जवळीक ठेवून रंगवली आहेत. पूर्णपणे फोटो रिॲलिझम न स्वीकारता आवश्यक तेथे आकारांचे आणि रंगाचे विरूपीकरण करण्याचे स्वातंत्र्यही मी घेतले आहे. चित्रांचे विषय एखाद्या प्रसंगावर आधारित असले तरी प्रसंगवर्णन करणे किंवा इलस्ट्रेट करणे हा उद्देश नसून चित्रातील गर्भित आशय प्रस्तुत होणारी रचना साकार करण्याचा माझा प्रयत्न असतो.



'My Dream', Oil on canvas 24" x 30"

सातत्यशील रेखांकन, व्यक्तिचित्रण, वस्तुचित्रण आणि निसर्गचित्रांचा अभ्यास यामुळे बोधचित्रांच्या रचनेला पूरक आधार मिळाला ही वस्तुस्थिती आहे. प्रस्तुत पुस्तकात अशा बोधचित्रांच्या मालिकेतली काही निवडक चित्रे सादर केली आहेत. चित्राचा विषय, त्यामागची प्रेरणा, चिंतन आणि प्रत्यक्ष रेखाचित्रापासून पूर्ण चित्र साकार करतानाचा अनुभव याचा तपशील चित्रांसोबत दिला आहे. अभ्यासकाने चित्रांचे किंवा रचना पद्धतीचे अनुकरण करू नये असा स्पष्ट आणि प्रेमळ सल्ला मी इथे देऊ इच्छितो. कारण केवळ अनुकरणाने कलाकार स्वतःच्या स्वयंप्रेरित रचनाशक्तीला मुकतो. त्यामुळे या पुस्तकातून प्रेरणा घेऊन आपल्यामध्ये असलेल्या अंतर्भूत कल्पनाशक्तीला जागृत करावे आणि स्वयंभू कलानिर्मिती करावी हा हेतू आहे.

वासुदेव ता. कामत

## दिव्य स्पर्श (Touch of God)

भगवंताचा स्पर्श हा परिस स्पर्शापेक्षा मौल्यवान असतो.

समर्पण भावनेचे मूल्य अमोल असते. देताना 'इदं न मम' किंवा 'कृष्णार्पण' म्हणण्याची आपली भारतीय परंपरा आहे. अर्चना आणि पुण्यप्राप्ती असे कर्मफल सांगणारा विचार मनात आला त्या वेळी सहजच भगवान श्रीकृष्णाची मूर्ती डोळ्यांसमोर तरळू लागली. कृष्णाच्या मुकुटावरचे मोरपीस त्याच्या मुखारविंदाची शोभा अधिकच खुलवणारे. कृष्णाच्या डोक्यावरचे हे पीस त्याला कोणी अर्पण केले, आणि ते देणाऱ्या प्रिय भक्ताला काय प्राप्त झाले असावे असा सहजच मनात विचार येऊन गेला.

पुराण ग्रंथांचा अभ्यासक कदाचित याचे संदर्भासहित उत्तर देऊ शकेल, परंतु आपल्या मनातल्या पुस्तकातील भावना-पंक्ती वाचून कुतूहलाचा संदर्भ घेत चित्र साकार करण्यातला आनंद काही औरच असतो.

'...गोकुळच्या वृंदावनातला एक धवलकांती मयूर घननिळ्या बाळकृष्णाकडे आकर्षित होऊन आला असता, कृष्णाने आपल्या अंगुली स्पर्शाने विश्वातले सर्व रंग त्याला बहाल केले आणि त्या उपकृत भावनेने प्रेमाच्या चंचुत धरलेली मयूर पिसाची पताका त्याने बाळकृष्णाच्या शिरपेचात रोवली.' ही कृष्णचरित्रातली सत्यकथा नाही, हे केवळ माझे कल्पित!

कल्पना सुचली की त्वरित चित्रातून मूर्त स्वरूपात साकार झाल्याशिवाय समाधानाचे तरंग अनुभवता येत नाहीत. या विचारांचा ओघ जलरंगाने चित्रबद्ध झाला आहे. विचारांना दृश्य जाणिवेची जोड मिळाली की त्याची तीव्रता अधिक असते. परंतु वेळ जशी निघून जाते तसतशी त्याची तीव्रता कमी होण्याची शक्यता असल्याने मनात सुचलेली कल्पना विरून जाण्यापूर्वी निदान रेखांकनाद्वारे कागदावर आकारबद्ध व्हावी.

अनेक वेळा माझ्या चित्रातील मनुष्याकृती पाहून मला विद्यार्थी विचारत असतात की, 'प्रत्यक्ष मॉडेलचा वापर करता का?' प्रश्न रास्त आहे. मी प्रथम माझी कल्पना रेखांकित करतो आणि मग मॉडेलचा किंवा साहाय्यभूत छायाचित्रांचा वापर करतो. परंतु त्याचा वापर अनुकरणासाठी अजिबात नसतो. आधार केवळ आपल्या चित्रातील मनुष्याकृतींच्या ॲनाटॉमीमध्ये अचूकता आणण्यासाठी असतो. फोटो किंवा मॉडेलच्या आधाराने आपल्या चित्रातील रचना बदलणे इथे योग्य नसते. यामुळे आपली कल्पनाशक्ती कमजोर होते. म्हणून या बाळकृष्णाचे आणि मोराचे चित्र केवळ माझ्या कल्पनेची प्रस्तुती होती.

# दूधभाऊ (Cow Boy)

'बाल कृष्णाच्या लीला' समजून घेण्यासाठी 'कृष्णचरित्र' वाचण्याची जरुरी नाही. आपल्या घरातल्या लहान मुलांची बाललीला ही कृष्णलीला म्हणून आपण पाहू शकतो. माझ्या नातवाच्या आकार वर्तनेतच मला अनेक कृष्णलीला दिसल्या. त्यामुळे त्याचा लाइकनेस ठेवून मी अनेक कृष्णचित्रे रंगवली. कृष्णचित्रांची मालिका रंगवताना ग्रंथ वाचण्यापेक्षा पूर्वीपासून ऐकलेल्या कृष्ण कथांचाच मला जास्त उपयोग झाला. 'कृष्ण' या चित्रमालिकेत धारोष्ण गाईचे दूध बाल कृष्णाला पाजणारी यशोदा मी दाखवली होती. आमच्या लहानपणी गावी आजीने आम्हाला गाईच्या पान्ह्याचे धारोष्ण दूध पाजल्याचे मी ऐकले होते. चित्र रंगवताना कपिला गाय मी काळी ठेवली आहे. हेतू असा की गाईचा रंग काळा असो किंवा तांबडा, तिचे मायेचे दूध पांढरेच असते. त्यात बाह्यरंगाचा भेद उरत नाही.

'दूधभाऊ' या चित्रात बाल कृष्णाचा खट्याळपणा आणि धारोष्ण दुग्धपान हे एकत्र दाखवायची कल्पना सुचली. काळ्या कपिलेच्या आचळांना एका बाजूने लुचणारे वासरू आणि दुसऱ्या बाजूने आपला हक्काचा वाटा घेणारा बाल कृष्ण. या चित्रात कपिला गाय मागे वळून वात्सल्याने पाहते पण ते पोटच्या वासरापेक्षा बाल कृष्णाकडे.

चित्रात कोण कुणाचा दूधभाऊ हे प्रेक्षकाने ठरवावे. या जलरंगातल्या चित्राकडे पाहताना प्रत्येकाच्या चेहऱ्यावर मंदस्मित उमटतेच. चित्रातल्या गाईच्या, कृष्णाच्या आणि वासराच्या बोलीतच सारे काही सामावलेले आहे. आणि तिघांच्याही भावनेत तृप्तीचा अनाहत हुंकार आपल्याला जाणवतो. कृष्णाचे गोकुळातले बालपण कसेही आणि कितीही रंगवावे, ते अप्रतिम आणि अमर्याद आहे.

## ‘नष्टोऽर्मोहा स्मृतिर्लब्धा...’

कृष्णाचे नाव घेताच त्याची दोन स्पष्ट रूपे आपल्याला जाणवू लागतात. एक आपल्या बाललीला दाखवणारा गोकुळचा कान्हा आणि दुसरा म्हणजे कुरुक्षेत्रावर गीताज्ञान देणारा महाभारतातला द्वारकाधीश. हे दोन्ही एकच की वेगवेगळे असे विद्वानांनाही संभ्रमात टाकणारे त्याचे जीवनचरित्र. शेवटी मी सर्व चराचर व्यापून आहे असे सांगितल्यावर कुणाची छाती आहे त्याला विभागण्याची!

‘कृष्ण’ चरित्राची बोधचित्रे साकारत असताना त्याचे विश्वरूप दर्शन दाखवल्याशिवाय अधुरेपणा राहील असे सारखे वाटत होते. पूर्वापार प्रचलित असलेले विश्वरूपाचे चित्र अनुसरून त्या क्रमवारीत आणखी एका चित्राची भर पडली असती तर माझ्या चित्रावर कुणी आक्षेप घेतला नसता. परंतु माझ्या मनाला एक प्रश्न सारखा सतावत होता. जे विश्वरूप केवळ दिव्यदृष्टीप्राप्त अर्जुन आणि व्यासकृपाप्राप्त संजय या दोघांनी पाहिले ते मी नुसतेच वर्णन वाचून चितारणे हे कमीपणाचे ठरेल. म्हणून काही दिवस ५ फूट x ८ फुटाचा कॅनव्हास माझ्या स्टुडिओतल्या भिंतीवर तसाच होता.

आणि अचानक एक दिवस विश्वरूपाची चित्रकल्पना माझ्या मनातल्या कॅनव्हासवर उमटू लागली. विश्वरूपाचा अमर्याद पसारा वर्णन करणारी अनेक कविश्रेष्ठांची लेखणीदेखील जिथे तोकडी पडते ते रूप माझ्या ५ फूट x ८ फुटाच्या कॅनव्हासवर कसे काय मावणार, तेव्हा त्याच्या चरणांशीच आपण लीन व्हावे असे वाटू लागले. केवळ दोन मोठी पावले कॅनव्हासवर दाखवून वरचा सर्व विश्व व्यापणारा कृष्ण माझ्या कॅनव्हासच्या चौकटीबाहेर! त्याचा साक्षात्कार ज्याने त्याने करून घ्यावा. माझ्या स्केचिंग पॅडवर मधोमध दोन समचरणांचे युगल आणि त्या पावलांशी नतमस्तक झालेला आणि अज्ञानाचे कोष फोडून बाहेर येणारा अर्जुन दाखवला. पण ती पावले विष्णूची किंवा विठ्ठलाची वाटू लागली. मग ती खोडून दीड पायावर पाय दुमडून (क्रॉसलेग) उभ्या असलेल्या कृष्णाची पावले दाखवली तेव्हा खरे समाधान झाले.

एखादी कल्पना सुचते आणि ती साकारत असताना पूर्वी केलेल्या अनेक निरीक्षणांचे अनुभव गाठीशी असतात. एखाद्या विषयाचे चिंतन करत असताना पोषक अशा संदर्भांची पोतडी आपल्या मनश्चक्षूंसमोर उघडली जाते. फार पूर्वी एका चित्रपटात लिओनार्दोने केलेल्या अश्वारूढ पुतळ्याचे वर्णन वसारी हा तत्कालीन इतिहासकार व समीक्षक वाचत आहे असे दाखवले होते. अश्वारूढ पुतळ्याचे धातूकाम होण्यापूर्वीच शत्रूच्या आक्रमणात तो प्लॅस्टरचा पुतळा फोडला गेला, त्यामुळे तो आपल्याला प्रत्यक्ष पाहता येणार नाही. आपण केवळ त्याचे वर्णन वाचू असे चित्रपटातला निवेदक सांगतो. या प्रसंगात वसारीच्या मागे लिओनार्दोच्या स्टुडिओच्या कमानीमधून केवळ त्या अश्वाचे पाय दिसत असतात. ते दृश्य मला आठवले आणि वरील विश्वरूप दर्शन चित्राची कल्पना माझ्या मनःपटलावर आकार घेऊ लागली.

आणि त्या वेळी अर्जुनाप्रमाणे मीदेखील म्हणू लागलो,

‘नष्टोऽर्मोहा स्मृतिर्लब्धा...’

## अबब! (Think Big!)

'गजराज' या प्रदर्शनाची आजही अनेक जण आठवण काढतात. या मालिकेतले पहिले चित्र महाकाव्यातील 'नरोऽ वा कुंजरो वा!' या प्रसंगावर आधारित रंगवले होते. तरी या मालिकेला गती देण्याची क्षमता या चित्रात नव्हती हे मी स्पष्ट कबूल करतो. या मालिकेच्या अगोदर रंगवलेली 'बालपण' (दि एज ऑफ इनोसन्स) या चित्रांची मोहिनी पुसली गेली नव्हती, त्यामुळे अनेक महान व्यक्तींच्या बालपणातील कर्तृत्वाचे प्रसंग मला वारंवार प्रेरणा देत होते.

'गजराज' मालिका रंगवताना दुसरे चित्र गुंफले ते हे 'अबब!' (Think Big!) या चित्रातील हा मुलगा कोण असे कुणी विचारले की, 'हा बालवयातला विष्णुगुप्त चाणक्य!' असे मी सांगत असे. वास्तविक चाणक्याच्या बालपणाविषयी दंतकथेव्यतिरिक्त ऐतिहासिक आधाराने फारसे काही मी वाचले किंवा ऐकले नव्हते. परंतु तत्कालीन भ्रष्ट राज्यकर्ते, ग्रीक, यवनांचे भरतवर्षावरील आक्रमण आणि विखुरलेली भारतीय मानसिकता याचा चाणक्यासारख्या विचारवंतांनी अभ्यास केला असावा. त्या परिस्थितीत चाणक्याच्या मनात काय चालले असावे याची कल्पना करून मला एक चित्र सुचले ते असे.

लाकडाचे हत्ती, घोडे आणि लाकडी बाहुल्या ही प्राचीन काळातील मुलांची खेळणी होती. चाणक्यदेखील बालपणी लाकडी हत्तीवर बसून खेळताना दाखवला तर ते चुकीचे दिसणार नाही असे वाटले. अशा लाकडी खेळण्यावर बसून धावताना एक खराखुरा हत्ती जवळून जातो, त्या वेळी त्याचा अवाढव्य आकार पाहून तो कसा अवाक् होऊन पाहत राहतो आणि त्याला स्वतःचे लाकडी खेळणे किती छोटे वाटते...! बसावे तर या हत्तीवर आणि त्यावर अंकुश चालवावा ही त्याची महत्त्वाकांक्षा!

विष्णुगुप्त चाणक्याची कल्पना चित्रासाठी निमित्तमात्र होती. परंतु गजराजावर अंकुश चालवण्याची त्या बालकाची उच्च विचारसरणी गजराजाच्या मोठ्या आकाराने भासमान करावयाची होती. चित्र पूर्ण झाले तेव्हा ते चाणक्याचे चित्र म्हणून राहिलेच नव्हते. चित्राच्या जवळ जाऊन शीर्षक वाचले असता, 'अबब!' असे उच्चारून प्रेक्षक पुन्हा त्या बालकाच्या नजरेने त्या हत्तीकडे पाहत राहतो.

## ‘बुद्धं शरणं गच्छामी...’ (बुद्ध आणि अंगुलीमाल)

आतापर्यंतच्या अनेक मालिकांमध्ये मी बुद्ध विषयावर संकल्पना चित्रे रंगवली आहेत. काही वेळा स्वतंत्रपणेदेखील बुद्ध चित्रे रंगवली. त्यामुळे ‘इतिपि सो भगवा...’ या मालिकेच्या मागे व पुढे बुद्ध चित्रांची जोड कायम राहिलेली आहे. बुद्ध आणि अंगुलीमाल हे चित्र अशाच शृंखलेमधले एक.

भगवान बुद्ध म्हणतात की प्रत्येकामध्ये बोधिचे बीज असते. ते विकसित झाले की ती व्यक्ती विकारमुक्त होऊन अर्हत अवस्थेला पोचून निर्वाण पदाचा साक्षात्कार घेऊ शकते. बुद्ध आणि अंगुलीमालची अशीच एक धम्म विचार जागवणारी घटना आहे. बुद्धांप्रमाणेच पुढेही अनेक संत पुरुषांच्या संपर्कात आलेले क्रूरकर्मादेखील संत पद प्राप्त करतात अशी उदाहरणे आहेत. अशी प्रेरणास्थळे मानवी मनाच्या विकृत प्रवृत्तींना आळा घालून त्याला सन्मार्गाला लावण्याचे काम करत असतात.

अंगुलीमालचे मूळ नाव अहिंसक. प्रसेनजीत राजाच्या मंत्र्याचा तो मुलगा. उच्च शिक्षणासाठी तक्षशीलेला गेला असता तिथल्या गुरुशिष्यांच्या डावपेचात फसवला जातो आणि त्याचे गुरु त्याला एक हजार मनुष्य हत्येची गुरुदक्षिणा मागतात. तिथून त्याची डाकू प्रवृत्ती जागी होते आणि मारलेल्या मनुष्य वधांची मोजणी करण्यासाठी मृत व्यक्तीच्या करंगळीची माला तो गळ्यात घालून फिरू लागतो. तेव्हापासून तो ‘अंगुलीमाल’ या नावाने कुप्रसिद्ध होतो. नऊशे नव्याण्णव मनुष्य हत्येनंतर हजारावी हत्या करण्यास तो बुद्धांचा पाठलाग करत असता ‘थांब गोसावड्या’ म्हणून हाक मारतो, त्या वेळी बुद्ध वळून उत्तर देतात, ‘मी कधीचा थांबलो आहे, तू कधी थांबणार!’ या एका करुणा वचनाने अंगुलीमालच्या बोधी बीजाला अंकुर फुटतो. बुद्धांच्या मैत्री स्पर्शाने त्याच्या विकारांचा आणि क्रूरतेचा महासागरदेखील आटून जातो.

आपल्यातला दोष अपराधी मनाने स्वतःलाच जाणवतो त्या वेळी त्या विकारांचे स्तर उतरू लागतात. परंतु ज्या विकारांनी आपल्या मनाचा ताबा घेतला आणि आपल्या शरीरात घर करून राहिले ते विकार निघतानादेखील असंख्य वेदना होतात. हा निसर्गनियम आहे हेच मला या चित्रातून दाखवायचे होते.

शरण येणाऱ्या अंगुलीमालने बुद्ध पायाशी फतकल मारली आहे. त्याच्या क्रूरतेची अंगुलीमाला तुटून विखुरली आहे. आणि पाठमोरी दिसणारी बुद्धांची पारदर्शक प्रतिमा करुणाप्रधान आणि मैत्री देणारी आहे. बुद्धांची समचरण पावले त्यांचे अधिष्ठान दाखवतात. चित्रातील गूढ अशी रंगयोजना करताना आकाशात विकारांचा अस्त आणि बोधी प्रभेचा उदय अशी संमिश्र स्थिती प्रकट करण्याचा मी प्रयत्न केला आहे.

## गजलक्ष्मी

'गजराज' ही बोधचित्रांची मालिका खूपच लोकप्रिय झाली होती. त्यातले 'गजलक्ष्मी' हे चित्र रसिकांचे विशेष आकर्षण होते. आपल्याकडे काही पारंपरिक संकल्पना आणि प्रतीके इतकी प्रचलित असतात की त्याची पुनरावृत्ती आपल्या चित्रात करणे मला तरी योग्य वाटत नाही. परंतु एखाद्या मालिकेत ती संकल्पना टाळताही येत नाही.

हत्ती आणि संपत्ती यांचे प्रतिकात्मक नाते आहे. कदाचित समुद्रमंथनाच्या कथेत गजराज ऐरावत आणि लक्ष्मी ही एकाच समुद्रातली उत्पत्ती असल्याने हे बंधुत्वाचे नाते लोक मानत असावेत. आजही दारात हत्ती आला तर शुभशकुन मानला जातो. आपल्या घरी लक्ष्मीचे आगमन झाल्याचा आनंद होतो.

घरात लक्ष्मीचा वास प्रत्येकाला हवा असतो. पूर्वी दाराच्या उंबरठ्यावर नाणी ठोकून बसवली जात. घरात येणारी नववधू ही लक्ष्मीच्या रूपाने माप उलथून घरात प्रवेश करत असते. ही प्रथा आजही अनेक जण पाळत असतात. या सर्व गोष्टींचा विचार करता करता 'गजलक्ष्मी' चित्राची कल्पना रेखाटली. दारातून उंबरठ्यावरचे माप ओलांडून आत प्रवेश करणारी गजलक्ष्मी! तिच्या भाळी असलेले मांगल्याचे मोठे कुंकू, कमलपुष्पाच्या मुंडावळ्या आणि लाजत मुरडत प्रवेश करणारा आविर्भाव ही चित्रातील दृश्य संकल्पना वेगळ्याने स्पष्ट करावी लागतच नाही.

चित्र नुसते पाहायचे नसते तर ते वाचायचे असते. चित्रमालिकेत अनेक विषयांची गुंफण केली तरी प्रत्येक चित्र ही स्वतंत्र अभिव्यक्ती असते. विषुववृत्ताच्या परिघावर दक्षिण आफ्रिकेपासून पूर्वेकडे मलाया बेटापर्यंत भारतासहित सर्व देशांत हत्ती दिसतो. परंतु आपल्या भारतीय संस्कृतीत हत्तीला जंगलापासून सामाजिक जीवनापर्यंत सर्व क्षेत्रांत स्थान आहे. कधी तो सर्कशीत आहे. कधी मंदिरात आहे. राजेशाही मिरवणुकीत आहे. चित्रांत-शिल्पांत, साहित्यातही आहे. इतकेच नव्हे तर एखाद्या सुंदर ललनेच्या चालीमध्ये 'गजगामिनी' चालदेखील आहे.

अशी ही गजलक्ष्मी सर्वार्थाने समृद्ध आणि संपन्न आहे.

# तोरा शाम रंग दै दे! (राधा-कृष्ण)

कृष्ण चरित्रात 'राधा-कृष्णा'चे प्रीती पर्व त्रिकालाबाधित आहे. शुद्ध, सात्त्विक आणि आध्यात्मिक प्रीती संगमाचे अनन्यसाधारण उदाहरण मानवी इतिहासात या सम हेच. कृष्ण चित्रांच्या मालिकेत राधा-कृष्णाचे चित्र कलाकाराला न सुचणे म्हणजे ती त्याची अपरिपक्वता म्हणावी लागेल.

परंतु ज्या गोपालकृष्णाने वयाच्या अकराव्या वर्षी गोकुळ सोडले आणि तो मथुरेला गेला, त्याचे वृंदावनात परतणे झालेच नाही असे पुराण इतिहास सांगतो. इतक्या लहान वयातल्या कृष्णाला गोपिका आणि राधाबरोबर काम रतिक्रीडा करताना दाखवणे किंवा काव्य-गीतात वर्णन करणे कितपत योग्य असे माझ्या मनाला सारखे वाटत राही. त्यामुळे आपल्या चित्रमालिकेत राधा-कृष्णाची एकरूपता रतिक्रीडेशिवाय साकारण्याकडे माझा कल होता.

एखाद्या स्त्रीला कृष्णासारख्या बालकाचा लळा लागणे, त्याच्याविषयी अनासक्त प्रीती वाटणे आणि त्याच्या अनुपस्थितीत विरहवेदना होणे हे नैसर्गिक आहे. म्हणून त्यांच्या प्रीतीला कामक्रीडेचे रूप देऊन त्यांचा विवाह करण्याप्रत कविकल्पनेची मजल जाते हे माझ्या मनाला तरी पटत नाही. या भावनेतून कुणाच्या श्रद्धाभावनेशी मला विद्रोह करावयाचा नाही.

कृष्ण मथुरेला गेल्यावर विरहवेदनेने राधेला कृष्ण दर्शनाचा आवेग होतो आणि कृष्णाची प्रतिमा पाहण्यासाठी ती अनोखा उपाय योजते ही माझी कल्पना. राधेने कज्जलाने आपले तोंड घननिळे काळे करून रंगवले, भालप्रदेशावर गोपीचंदनाचे उभे पुंडरिक लावून डोईच्या केशसंभारात मयूर पंख रोवून कृष्ण रूपाशी एकरूप झाली. आणि कृष्णानेच फोडलेल्या मडक्याच्या खापरात साचलेल्या यमुना जळात कृष्णबिंबाचे दर्शन घेतले.

चित्रातील रंगयोजना पारंपरिक लघुचित्रातील रंगापेक्षा अगदी भिन्न आहे. यात राधेचा गौरवर्ण आणि कृष्णरंगी मुखारविंद यालाच प्राधान्य राहील अशी दक्षता घेतली. राधेची धवल वस्त्रे आणि पार्श्वभूमीला आकाशाची निळीमा ही एक-दुसऱ्याशी मेळ ठेवणारी आणि उजळ दाखवली. त्यामुळे चित्रातली राधा प्रतिबिंबातल्या कृष्णाला पाहून पुटपुटते...

'तोरा शाम रंग दै दे!'

## मेत्ता भावना (मैत्री भावना)

'गजराज' आणि 'इतिपि सो भगवा...' ही दोन्ही प्रदर्शने एका पाठोपाठ भरवली होती. गजराजमध्ये दोन बुद्धांची हत्तीबरोबरची चित्रे या पुढच्या मालिकेत सूत्र धरूनच आली होती. एका मालिकेतून दुसऱ्या मालिकेचा जन्म होत आला आहे.

'मेत्ता भावना' या पाली शब्दांचा अर्थ मैत्री भावना. अंगावर धावून येणाऱ्या मदोन्मत्त हत्तीला भगवान बुद्ध मैत्री सामर्थ्याच्या स्पर्शाने शांत करतात असा या चित्राचा विषय. चित्र पाहताना त्या-त्या चित्राची कथा जाणून घेण्याची उत्सुकता रसिकांना असते. कारण चित्रातील रंग, आकारांची योजना आणि कलाकाराचे निर्मितीकौशल्य पाहताना आस्वादनाबरोबरच कथा विचाराचीही त्यात भर पडते.

गौतम बुद्धांचा मामेभाऊ देवदत्त याने कुटिल बुद्धीने बुद्धांचा वध करण्याच्या हेतूने, राजकुमार अजातशत्रूच्या मदतीने नलगिरी नावाच्या मदोन्मत्त हत्तीला बुद्ध विचरण करत असलेल्या मार्गावर सोडले. त्याच्या भयाने रस्त्यावरचे लोक आणि भिक्षुसंघ सैरावैरा पळू लागले. परंतु भगवान बुद्धांनी मात्र न डगमगता रस्त्याच्या मधोमध उभे राहून मैत्री सामर्थ्याच्या बळावर नलगिरी हत्तीला शांत केले.

भविष्यकाळातील बुद्धांविषयी वाचनात आलेल्या पुस्तकात असाही संदर्भ मिळाला की पुढे कोण्या एका काळात हाच नलगिरी बुद्ध अवस्थेला पोहोचला. त्याची ही शांत पारमिता या बुद्धसंपर्कातून प्राप्त झाली. हे जरी कल्पित असले तरी चित्रातून शांत झालेला नलगिरी बुद्धांचे चरणस्पर्श करताना दाखवला.

बुद्धांची पाठमोरी आकृती अंगुलीमालच्या चित्रात जशी पारदर्शक दाखवली तशी या चित्रातही पारदर्शक असल्याने नलगिरीने वळवलेली सोंड स्पष्ट दाखवता आली. ही चित्रातील तांत्रिक बाजू. परंतु अशा रचनेतदेखील चित्राला अर्थप्राप्ती होते. तपःसाधनेने व्यक्ती तेजस होते. अशा तपस्वींना तेजस ऋषी असे म्हणतात. चित्रातील बुद्ध प्रतिमेची पारदर्शक स्थिती या 'तेजस' संकल्पनेला पूरक आहे.

अशा प्रकारची विचार शृंखला चित्र काढताना मनात चालू असते. परंतु याच दिशेने चित्र पाहिले जाईल अशी ग्वाही देता येत नाही. चित्राची आकलनकक्षा ते पाहणाऱ्याच्या कल्पनाशक्तीनुसार रुंदावत असते.

# सुजाताची खीर

बोधिप्राप्ती होण्याच्या आदल्या दिवशी वटवृक्षाच्या खाली बसलेल्या भगवान बुद्धांना 'वटदेवता' समजून सुजाता (ग्रामप्रमुखाची कन्या) नवस म्हणून खीर देते आणि त्या खिरीचे सेवन करून सिद्धार्थ गौतम बोधिप्राप्तीकरता पिंपळ वृक्षाखाली अधिष्ठान बैठक मारून बसतात ते निश्चय करूनच. ही खीर बुद्धांनी ४९ घासांत संपवली. पुढे बोधिप्राप्तीनंतरचे सात आठवडे निर्वाण अवस्थेत भगवंतांनी कुठलेच अन्नग्रहण केले नाही, अशी एक बुद्धकथा आहे.

सुजाताने दिलेल्या खिरीला बुद्ध जीवनामध्ये महत्त्वाचे स्थान आहे. निर्वाण साक्षात्कारापूर्वी खाल्लेली खीर आणि महानिर्वाण प्राप्तीला कारण झालेल्या आणि अतिसाराच्या आजाराला कारण झालेली चुंद या भक्ताने दिलेली सुकरमुत्ताची भाजी या दोन्ही मला प्रिय आणि समान आहेत असे बुद्ध म्हणतात. ही त्यांची कृतार्थ भावना होती.

वटवृक्षाचे बीज खूप लहान असते. परंतु त्याचा वृक्ष झाल्यावर होणारा विस्तार खूप मोठा आणि दीर्घायू असतो. अवकाश आणि काल व्यापून पसरण्याची अशी क्षमता अन्य कुठल्या वृक्षात क्वचितच असावी. जन्मजन्मांतरीच्या काळात गौतम बुद्धांनी पारमितांचे संचित साठवले आणि बोधिप्राप्तीकरता अखंड तपस्या केली. ते तापस बळ आणि अधिष्ठान दाखवण्यासाठी चित्रात वटवृक्षाच्या पारंब्या आणि मुळांची रचना मला सयुक्तिक वाटली. संपूर्ण चित्राची चौकट व्यापून राहिलेला वटवृक्ष भगवान बुद्धांची ऊर्ध्वगामी ध्यानस्थ बैठक आणि अर्धोन्मीलित सम्यक दृष्टी यातून साधनेचा परिपाक जाणवतो. शीलवान आणि पवित्र मनाने आर्जवपूर्वक खिरीचे दान देणारी सुजाता, धवलवस्त्रा, जमिनीवर स्त्रीसुलभ स्थितीतली तिची बैठक, मोकळा केशसंभार आणि त्यात माळलेली पांढरी कमल पुष्पे ही सुजाताच्या व्यक्तिमत्त्वाची ओळख करून देतात.

काही वेळा चित्रातील रचना, आकार, रंगयोजना आणि कुशलता यांचा इतका चपखल मेळ बसतो की त्यात आणखी कशाची भर घालावीशी वाटत नाही. आणि परिपूर्णता अशी की त्यातून एखादी गोष्ट वगळावीशी वाटत नाही.

तसाच काहीसा अनुभव मला हे चित्र रंगवताना आला.

## बोधिप्राप्त - सम्यक सम्बुद्ध (Enlightenment)

आतापर्यंतच्या बोधचित्रांमध्ये काही चित्रे असे काही कमालीचे समाधान देऊन गेली की त्या आनंदाचे तरंग इथे शब्दांत व्यक्त करता येणार नाहीत. वैशाख पौर्णिमेच्या उत्तर रात्री पहाटेच्या पूर्वी सिद्धार्थ गौतमाला बोधिप्राप्ती झाली; निर्वाणाचा साक्षात्कार झाला. ते सम्यक सम्बुद्ध झाले. त्या वेळी त्यांच्या शरीरातून तेज किरणांचे प्रकाशझोत बाहेर पडले असे वर्णन करतात.

भगवान बुद्ध हे एकमेव महान व्यक्तिमत्त्व आहे की ज्यांचा जन्म वैशाख पौर्णिमेला झाला. शाल्व वृक्षाखाली खुल्या वातावरणात आणि निसर्गाच्या सान्निध्यात त्यांना सम्यक संबोधि प्राप्त झाली, तीही वैशाख पौर्णिमेला बोधिवृक्षाखाली; निसर्गाच्या सान्निध्यात आणि त्यांना महानिर्वाण प्राप्त झाले तेदेखील शाल्व वृक्षाखाली, वैशाख पौर्णिमेला निसर्गाच्या सान्निध्यात.

भगवान बुद्धांनी तत्कालीन ध्यानधारणा आचार्य आलार कालाम आणि आचार्य उद्दक रामपुत्र यांच्याकडे शिकून घेतली. परंतु दुःखनिरोधाचे पूर्ण समाधान प्राप्त न झाल्याने त्यांनी स्वतंत्र तपसाधना सुरू केली आणि विशुद्ध मार्गाचा शोध घेऊन ज्ञानप्राप्ती केली. हे त्यांचे स्वयंभू ज्ञान होते. स्वयंभू म्हणजे स्वयंप्रकाशित. इथे परप्रकाशाचा अंश लेशमात्रही नव्हता.

चित्र रंगवताना बुद्ध कथेला प्रमाण मानून बोधिवृक्षाच्या पलीकडे आकाशात पूर्णचंद्राची प्रतिमा रंगवली आणि स्वयंप्रकाशित भगवान बुद्ध तेजःपुंज दाखवले. या चित्रातली रंग किमया अशी की बुद्ध प्रतिमेला सर्वांत उजळ रंग आणि पूर्णचंद्रातला उजळ रंग एकाच तीव्रतेचे आहेत. तरी तो चंद्रप्रकाश भगवंतांच्या प्रकाशापेक्षा फिका वाटतो. असे दाखवण्याचे कारण म्हणजे चंद्र हा परप्रकाशित आहे आणि भगवान बुद्ध हे देदीप्यमान स्वयंप्रकाशित परंतु शांत शीतलमुद्रा असलेले. भगवंतांचे नेत्रमणी नील वर्णी दाखवल्याने त्यांच्या शीतलतेत आणखी भर पडली.

चित्रातला विषय, सुचलेली कल्पना, विचारांना पूर्वश्रुत कल्पनांची जोड आणि चित्रातली आकार रंगसंगती या सर्वांचा मेळ बसला म्हणजे मिटल्या डोळ्यांनाही समाधान मिळते कारण त्या वेळी आपल्या शरीरात अनाहत तरंगांची संवेदना जाणवत असते.

## ‘हे माझे घर, ते माझे घर!’

### (Her dream is on her paper)

१९८४ ते १९९२ पर्यंत माझ्या प्रदर्शनात पोर्ट्रेट आणि लॅन्डस्केप अधिक प्रमाणात असत. मुंबईपासून दूर वेगळ्या प्रांतात जाऊन तिथला निसर्ग आपल्या चित्रांत उतरवायचा आणि त्याचे प्रदर्शन भरवायचे हा पायंडा मी आजही पाडून घेतलेला आहे. निसर्गाच्या सान्निध्यात जाऊन तिथल्या वातावरणाच्या प्रेरणेने निसर्गचित्र आणि स्थानिक नागरिकांची पोर्ट्रेट करणे मला फार आवडते. परंतु आता मात्र एखादा विषय घेऊन बोधचित्रांची मालिका मी प्रदर्शित करत असतो. याची सुरुवात मी ‘प्रतीक्षा’ हा विषय घेऊन केली. कुणाची तरी वाट पाहणे, प्रियजनांची वाट पाहणे, सुसंधीची वाट पाहणे, स्वप्नपूर्तीची वाट पाहणे, साधनेच्या फलप्राप्तीची वाट पाहणे अशा नाना अंगाने प्रतीक्षा हा विषय मी त्या वेळी चित्रबद्ध केला. त्याच मालिकेतले हे चित्र ‘हे माझे घर, ते माझे घर’.

आपले स्वतःचे असे घर असावे अशी प्रत्येक कुटुंबप्रमुखाची इच्छा असते. आम्ही स्वतः अनेक वर्षे भाड्याच्या चाळीत दिवस काढल्यामुळे स्वतःच्या घराची स्वप्ने काय असतात ते अनुभवले आहे. घराचे स्वप्न मनातून कागदाच्या आराखड्यात उतरते आणि बिना भिंतीच्या चौकटीतून आपण घरकुलाची स्वप्ने पाहू लागतो. आपल्यासमोर किडा-मुंगी, पक्षी आडोशाची घरटी बांधतात पण आपण मात्र प्रतीक्षेच्या दारात थिजून आयुष्य कंठत असतो, अशी काहीशी उदास अवस्था मी या चित्रातून व्यक्त केली होती. पूर्वीच्या काही चित्रांमध्ये स्वप्नसदृश अतिवास्तवतेचा परिणाम डोकावत असे. त्यापैकीच हे एक चित्र. त्या वेळच्या माझ्या अनेक चित्रांत आकाश आणि दूरवर क्षितिज रेषेपर्यंतचा अवकाश मी दाखवत असे. त्यामुळे चित्रातील विषयाला मनाची खोली प्राप्त व्हायची आणि पेंटिंगच्या फ्रेमव्यतिरिक्त एक वेगळीच चौकटही असायची. यातून चित्रातील विषयाचा प्रवेश होत असे. पुढे अनेक चित्रांत ही चौकट जणू माझ्या चित्र शैलीचा भाग होऊन बसली होती.

## मोगरा फुलला (Blissful Fragrance)

आपल्याकडे पूर्वीपासून अनेक संत-महात्म्यांनी श्लोक, अभंग, दोहे आणि ओवीसारख्या रचनांमधून जनमानसावर सद्वर्तनाचे संस्कार रुजवले आहेत. या संतांच्या रचना म्हणजे केवळ प्रतिभाशक्तीच्या जोरावर रचलेल्या कविकल्पना नाहीत. त्यांना स्वानुभवाची आणि साक्षात्काराची जोड होती. संतांनी रचना करताना त्यांच्या मनश्चक्षूंसमोर त्यांना कोणता साक्षात्कार झाला, त्याची दृश्य जाणीव चित्रांतून अभिव्यक्त करण्याचा मी प्रयत्न करू लागलो. महाराष्ट्रातल्या आणि अन्यभाषिक संतांच्या रचना घेऊन केलेली चित्रे पुढे 'मोगरा फुलला' या मालिका शीर्षकानेच प्रदर्शित केली. तमिळ प्रांतातल्या तिरूवल्लुवरपासून महाराष्ट्रातील आदि संत ज्ञानेश्वर ते आधुनिक संत विनोबा भावेंपर्यंत अनेक संत त्यांच्या रचना साक्षात्कारातून चित्रबद्ध झाले. या प्रदर्शनाला भेट दिल्यावर रसिकांनी, 'चित्रांतून आमच्या पूज्य संतांना तुम्ही चेहरा दिलात,' अशी कृतज्ञता व्यक्त केली.

ज्ञानेश्वरांच्या 'मोगरा फुलला' या ओवीचित्राने या मालिकेची सुरुवात झाली.

'इवलेसे रोप लावियले द्वारी तयाचा वेलु गेला गगनावरी ... फुलें वेचितां बहरू कळियांसी आला'

'पैल तोगे काऊ कोकताहे ... उड उड रे काऊ तुझे सोन्याने मढवीन पाऊ'

अशा दोन रचनांचे संमिश्र परंतु एक नेणिवेची जाणीव करून देणारे चित्र डोळ्यांसमोर तरळू लागले. ज्ञानेश्वर एका ठिकाणी आकाश गुंफेचा उल्लेख करतात. त्या द्वाराशी उंबरठ्यावर ध्यानस्थ बसलेले ज्ञानेश्वर अमृतानुभव घेत आहेत. दारी लावलेला मोगऱ्याचा वेलु गगनापर्यंत साऱ्या ब्रह्मांडाला व्यापून राहिला आहे आणि वर बसलेला काऊ शुभशकुन देत आहे. या चित्रातल्या सर्व गोष्टी म्हणजे ते कोलाज नसते. चित्र पाहताना वाचायला लावणारी ती जणू दृश्यकडवी असतात.

चित्र रंगवत असताना सारखे वाटत होते की ज्यांना या संताचे जीवनचरित्र माहीत आहे तेच या चित्रांचा आस्वाद घेऊ शकतील. परंतु मला आठवते की एक पाश्चात्त्य जोडपे खूप वेळ एकेक चित्र पाहत होते. ते शेवटी माझ्याकडे येऊन म्हणाले की, 'तुम्ही केलेल्या प्रत्येक चित्राला काही तरी कथा किंवा संदर्भ असावेत. आम्हाला ते माहीत नाहीत. परंतु एक गोष्ट आम्हाला जाणवली की या सर्व चित्रांत येशू ख्रिस्तांचा वास आहे.' हा आध्यात्मिक साक्षात्कार मला त्यांनी बोलून दाखवला. चित्राची भाषा जशी विश्वात्मक असते, त्याचप्रमाणे त्यातून प्रतीत होणारा भावही विश्वात्मक असतो.

मी मात्र स्वतःशीच पुटपुटलो, 'जो जे वांछिल तो ते लाहो...'

## ‘रूप तुझे कैसे पाहू त्यात आम्ही लीन...’

## (With You Within, Am Not Without)

अबीर गुलाल उधळीत रंग
नाथा घरी नाचे माझा सखा पांडुरंग।

पंडित जितेंद्र अभिषेकींनी गायलेला संत चोखामेळांचा हा अभंग प्रत्यक्ष पांडुरंगाने जर ऐकला असता, तर तो बंद दरवाजा उघडून चोखोबांबरोबर नाचला असता, इतकी उत्कटता चोखोबांच्या शब्दांत आणि अभिषेकींच्या स्वरात सामावलेली आहे.

आज गुगल इमेजला निर्देश दिला की बसल्या जागी पंढरपूरच्या पांडुरंगाचे दर्शन आपण घेऊ शकतो. परंतु १३व्या शतकाचा विचार करता त्या वेळच्या वंचित समाजाला ज्या मंदिराची पायरी शिवण्याचा अधिकार नव्हता, त्यांनी विठ्ठल मूर्तीचे दर्शन कसे बरे घ्यावे? असे असूनही चोखोबांची पत्नी, मुलगा, कन्या, जावई सारे कुटुंब विठ्ठलभक्त होते हे विशेष. साऱ्यांकडे पांडुरंगाचे स्तवन करण्याची काव्यप्रतिभा असूनही त्यांनी कधी त्याचे प्रत्यक्ष मूर्ती दर्शन घेतले नव्हते.

चोखोबांचे चित्र रंगवताना पंडितजींचे गाणे पार्श्वसंगीतासारखे ऐकत होतो. आणि चित्र त्यानुरूप आकार घेत होते. ‘उंबरठ्यासी कैसे शिवु आम्ही जातीहीन’ ही ओळ ऐकताना वाटे की चोखोबा बंड करून तक्रार करतात की काय; परंतु पुढच्याच ओळीत मूर्ती दर्शनाला गौण ठरवणारे विचार ते बोलून जातात, ‘रूप तुझे कैसे पाहू त्यात आम्ही लीन!’ सारी जाती बंधने झुगारून चोखोबांचे पांडुरंगाशी झालेले हे अद्वैत हृदयाला भिडून राहते.

मंदिराची सीमा ओलांडून बाहेर उडालेला अबीर गुलाल तसेच बंद दरवाजा आणि सवर्णांची ‘अस्पृश्य’ पायरी सोडून चोखोबांशी एकरूप झालेला पांडुरंग चित्राच्या चौकटीला गाभाऱ्याचे स्वरूप आणतो.

चित्र पाहत राहावे आणि पंडितजींनी गायलेला अभंग ऐकत राहावा. आपले डोळे अलगद मिटले जाऊन ब्रह्मानंदी टाळी कधी लागली ते कळणारच नाही. खरोखरीच या संतांची एकतरी ओवी आपण अनुभवावी.

## आषाढस्य प्रथम दिवसे... (At the first glimpse of rain...)

पुरा कवीनां गणना प्रसंगे कनिष्ठिकाधीष्ठित कालिदासः।
अद्यपि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव॥

कालिदासाचे मोठेपण सिद्ध करणारे वरील सुभाषित बहुश्रुत आहे. कुणा एका रसिकाने उत्कृष्ट कवींची गणना करण्यासाठी कालिदासाच्या नावे करंगळी दुमडली, परंतु त्याला तुल्यबळ दुसरा कवि सुचेना तेव्हा करंगळीच्या जवळचे बोटास अनामिका हेच नाम सार्थ आहे असे तो म्हणतो. कालिदासाच्या एकूण सात साहित्यकृती अधिकृतपणे प्रचलित आहेत. त्यापैकी 'अभिज्ञान शाकुंतलम्' आणि 'मेघदूत'चा अभ्यास केल्यावर एक गोष्ट प्रकर्षाने जाणवली की कालिदासाने मानवी स्वभावाला निसर्गातील गोष्टींची उपमा दिली, तर कधी निसर्गातील स्थित्यंतराचे वर्णन करताना त्याला मानवी स्वभाव वैशिष्ट्यांची उपमा देऊन काव्य सौंदर्य खुलवले. त्यामुळे 'उपमा कालिदासस्य' ही उक्ती सार्थ वाटते.

कालिदासाची कल्पनाशक्ती चित्रकारालाही प्रोत्साहन देणारी आहे. याच प्रेरणेने 'कालिदासानुरूपम्' या चित्रमालिकेत 'अभिज्ञान शाकुंतलम्' आणि 'मेघदूत'मधल्या काही रचनांना चित्ररूप देण्याचे मी साहस केले आहे. या बोधचित्रांमध्ये वास्तवदर्शी प्रसंगांना निसर्गातील वृक्ष-वेलींच्या लयबद्ध आलंकारिक आकारांची गुंफण घातली.

'आषाढस्य प्रथम दिवसे...' या पहिल्या चित्राने मी मालिकेची सुरुवात केली. कुणा एका शापित यक्षाला आपल्या विरही पत्नीची आठवण येते आणि निरोप धाडण्यासाठी आषाढ महिन्यातल्या पहिल्या दिवशी दृष्टीला पडलेला हत्तीसदृश एका मेघाला कुटजा फुलांची प्रेमांजली वाहून जवळ बोलावतो असे हे चित्र.

सुरुवातीला यक्ष कसा दाखवावा हाच माझ्यापुढे यक्ष प्रश्न होता. यक्ष योनीतले स्त्री-पुरुष बहुरूपी आणि निसर्गाशी एकरूप असतात असे ऐकले होते. त्यांच्याकडे सिद्धी, शक्ती असतात असेही वाचले होते. परंतु हा यक्ष शापित असल्याने त्याच्या शक्ती क्षीण झाल्या होत्या. 'कुणी एक यक्ष...' हाच त्याचा परिचय म्हणून पहिल्या चित्रात या यक्षाची पाठमोरी आकृती दाखवली. त्याच्या अंगाखांद्यावर, आजूबाजूच्या कमानीवर वल्लरी आणि कमलपुष्पे दाखवली. लहानपणी आकाशातल्या अमूर्त ढगांमध्ये निरनिराळे प्राणी ओळखण्याचे खेळ आम्ही खेळत असू. तसा हत्तीसदृश मेघ यक्षाच्या जवळ येताना मी दाखवला. या प्रदर्शनात अनेक संस्कृत विद्वान या पहिल्या चित्रापुढे उभे राहत आणि मला ऐकू जाईल अशा स्पष्ट आवाजात मेघदूताचे पहिले चरण पुटपुटत,

'कश्चित् कान्ता विरह गुरुणांस्वाधिकारात् प्रमत्तः'

## 'गुंतता हृदय हे...' (Spellbound)

दुष्यंत-शकुंतलेचे आख्यान महाभारतातल्या आदिपर्वात येते. ही मूळ कथा आदर्श स्वरूपात 'अभिज्ञान शाकुंतलम्' या नाटकात कालिदासाने अतिशय सुंदररीत्या काव्यबद्ध केली आहे. त्याच्या तुलनेत महाभारतातील कथा अगदीच रूक्ष म्हणावी लागेल. एखाद्या गोष्टीला उच्च कवीची प्रतिभा किती उंचावर नेऊ शकते याचे उत्तम उदाहरण म्हणजे 'अभिज्ञान शाकुंतलम्'.

दुर्वास ऋषींच्या शापाने शकुंतलेची दुष्यंताने दिलेली ओळखमुद्रा असलेली अंगठी शची तीर्थावर अर्घ्य देताना हरवते, त्या वेळचा हा प्रसंग. वास्तविक याचा उल्लेख केवळ एका वाक्यात कालिदासाने शकुंतलेच्या दासीच्या मुखी घातला आहे. याविषयी फारसे वर्णन त्याने जाणीवपूर्वक टाळले असावे कारण तोच त्याला पुढे सस्पेन्स ठेवायचा होता.

मी मात्र हे चित्र रंगवताना विचार करू लागलो की शची तीर्थावर स्नान-अर्घ्य पूजा करताना शकुंतलेचे ध्यान कुठे असावे? तिच्या नित्यकर्मातही अशी स्थिती मला दाखवायची होती. दुष्यंताच्या विचारात असताना तिला दुर्वासांचे आगमन कळले नाही, तसेच इथेही ती त्याच विचारात मग्न झाल्याने तिची मुद्रिका पाण्यात पडल्याचे तिला कळलेच नाही. ही मग्न अवस्था दाखवण्याकरता इथे शकुंतला कमलपुष्पावर घोंघावणाऱ्या भ्रमराकडे एकटक पाहत असल्याचे दाखवले. जणू दुष्यंताच्या पहिल्या भेटीस कारण झालेला भ्रमर तिला इथेही अस्वस्थ करत आहे.

कथेत पुढे ती अंगठी एका कोळ्याकडे सापडते कारण त्याला ती पकडलेल्या माशाच्या पोटात सापडलेली असते. म्हणून या चित्रातले शची तीर्थाचे पाणी खोलवर दाखवून ती अंगठी गिळणारा एक मासा दाखवला. प्रदर्शनात चित्र टांगताना हे चित्र इतर चित्रांच्या तुलनेत थोडे वर लावले होते, तेव्हा एका प्रेक्षकाने सुचवले की, हे चित्र शकुंतलेचा चेहरा पाहणाऱ्याच्या आय-लेव्हलला येईल इतके खाली आणा. मी हसून त्यांना म्हणालो की ते चित्र जाणून बुजून वर लावले आहे. चित्रातली शकुंतला पाहण्यासाठी नव्हे तर ती अंगठी अगत्याने तुमच्या दृष्टीस पडावी हा हेतू आहे.

चित्र रंगवताना जसा आपण कॉम्पोझिशनचा विचार करतो, तसेच ते भिंतीवर लावतानादेखील विचार करावा लागतो.

## तस्मै श्री गुरवे नमः (I seek your blessings Sir!)

भारतीय संस्कृतीमध्ये भगवंतापेक्षाही 'गुरु'पदाला अधिक मानाचे स्थान आहे. मातृ, पितृ, अतिथी आणि त्याच क्रमात आचार्यांना देव मानण्याचा संस्कार बालपणापासून केला जातो. जन्माला आल्यावर आपल्याला आई-वडिलांकडून जगाची ओळख होते आणि गुरूंच्या सान्निध्यात आल्यावर या सर्व 'भव' विश्वाचे कोडे उलगडत जाते, ज्ञानाचा प्रकाश दृग्गोचर होऊ लागतो.

साक्षात भगवंतालादेखील मनुष्यरूपात अवतरल्यावर ज्ञानप्राप्तीसाठी गुरुचरणी शरण जावे लागले. ज्या बाल कृष्णाचे बालपण अनेक चमत्कारांनी भरले आहे त्या कृष्णाला सांदीपनी ऋषींच्या आश्रमात इतर विद्यार्थ्यांबरोबर ज्ञानार्जन करतानाचे आणि गुरुसेवा करतानाचे वर्णनही पाहावयास मिळते.

गुरुगृही हवनकुंडासाठी काष्टके गोळा करून आणणे हा विद्यार्थ्यांचा नित्यक्रम असे. अशा वेळी बाल कृष्णाने सुक्या लाकडाची मोळी डोईवर धरली आहे आणि गुरूंच्या कुटीबाहेर तो विनम्र आणि ध्यानस्थ होऊन उभा आहे असे चित्र काढण्याची कल्पना मला सुचली. भगवंतालादेखील ज्ञानप्राप्ती करून घेण्यासाठी 'मी'पण सोडून द्यावे लागले. हे सुचित कसे करायचे याचा मी विचार करू लागलो. इथे कृष्णाने आपला परिचय करून देणारे डोईवरचे मोरपीस खाली उतरवून कमरेला खोवलेले दाखवले.

कुटीच्या बाहेर सांदीपनी ऋषींच्या पादुका, कृष्णाची कोवळी अनवाणी पावले आणि विनम्र भाव यातून प्रतीत होणारी संकल्पना 'तस्मै श्री गुरवे नमः' या रूपाने साकार झाली.

आपण काढलेले चित्र हे समजण्यास आणि उमजण्यास सोपे असावे असे मला वाटते. चित्रातून बोध द्यावयाचा असल्याने ते कोडे पडल्यागत भासू लागले तर ते बोधचित्र कसे ठरेल?

बोधचित्रातील रचना ही प्रायोगिक रंगभूमीवरच्या कमी नेपथ्य रचनेसारखी असते. नटांचा अभिनय आणि देहबोली यातून ज्याप्रमाणे प्रसंगाचे जिवंतपण सादर केले जाते, तशी माझी चित्रेदेखील कमीत कमी तपशील दाखवून आशय प्रकट करणारी असतात. चित्रांमध्ये वर्णन शैलीपेक्षा भावप्रदर्शनाला मी अधिक महत्त्व देत असतो.



Oil on canvas 25" x 40"

## ‘चंद्राचा करूनी गाडा...’ (Hey, it's mine)

साहित्यात चंद्राला जितके जिव्हाळ्याचे स्थान लाभले तितके अन्य कुठल्या ग्रहाला मिळाले नसेल. त्याच्या खडबडीत डागांचे आकार कलंक म्हणून वर्णिले तरी ते कधी सशासारखे म्हणून शशांक आणि कधी मृगासारखे म्हणून त्याला मृगांक अशी नावे आहेत. लहान मुलांसाठी तो चांदोबा किंवा चांदोमामा असतो; कधी तो लिंबोणीच्या झाडामागे लपतो, तर कधी प्रेमवीरांच्या मनोमिलनाचा साक्षी होतो. मलाही हा कल्पनेतला चंद्रच अधिक प्रिय आहे. चंद्र आणि खेळकरी मुलगा या विषयावर मी काही बोधचित्रे रंगवली त्यातले हे एक चित्र.

दिवाळीत पतंगाला आकाशकंदील लावून रात्री आकाशात उडवण्याचा खेळ होता. त्या वेळी हा कंदील आकाशातल्या चांदण्यांमध्ये वावरणाऱ्या चंद्रासारखा भासे. यातूनच एक कल्पना सुचली. एका मुलाने आकाशात उंचच उंच पतंग उडवला आणि तारका समूहातली एकेक चांदणी टिपून घेत शेवटी चंद्रच पटकवला, त्याचा गाडा करून आकाशातल्या प्रकाश मार्गावरून विजयाच्या उन्मादाने तो धावत सुटला. त्याच्या मागे निराधार झालेल्या सशाची ‘माझा चंद्र दे ना!’ अशी आकांत वाणी त्याला ऐकू येत नव्हती.

या चित्रांच्या मालिकेतला मुलगा हा साधारणपणे एकाच वयाचा आणि असाच अर्धनग्नावस्थेत दाखवला आहे. कारण त्याला कपडे आले की त्याला प्रादेशिकता चिकटते. हे टाळण्यासाठी केवळ नैसर्गिक अवस्था दाखवण्याचा इथे मी प्रयत्न केला.



वासुदेव कामत

☐ १९५६ - कर्नाटक राज्यात कारकळ येथे जन्म.

☐ १९७७ - जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधून जी. डी. आर्ट प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण, कॉलेजच्या वार्षिक प्रदर्शनात सुवर्णपदक, 'उषा देशमुख सुवर्णपदक'.

☐ १९८२ - 'बॉम्बे आर्ट सोसायटी'चे सुवर्णपदक.

☐ आजपर्यंत मुंबई, दिल्ली, बेंगलोर अशा विविध ठिकाणी यांची २१ स्वतंत्र चित्रप्रदर्शने झाली असून देश-विदेशातील अनेक कलाप्रेमींच्या संग्रहात यांची चित्रे आहेत.

☐ निसर्गचित्र व व्यक्तिचित्र या विषयांवर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट, बॉम्बे आर्ट सोसायटी, मॅक्स म्युलर भवन अशा विविध संस्थांमध्ये पंचवीसपेक्षा जास्त प्रात्यक्षिके सादर केली.

☐ चित्रकलेच्या अभ्यासाच्या व रेखांकनाच्या निमित्ताने भारतात अनेक ठिकाणी व परदेशातही दौरे केले.

☐ पोर्ट्रेट सोसायटी ऑफ अमेरिका या संस्थेच्या २००६ सालच्या इंटरनॅशनल पोर्ट्रेट कॉम्पिटिशनमध्ये 'ड्रेपर ग्रँड प्राइझ'.



माझी पेंटिंग आणि विचार

# वासुदेव कामत



सुप्रसिद्ध चित्रकार वासुदेव कामत यांची पेंटिंगमागची भूमिका,
विचार आणि चिंतन त्यांच्याच शब्दांत...



''वास्तववादी शैलीत काम करण्यासाठी अचूक रेखांकन,
प्रमाणबद्धता, पर्स्पेक्टिव्ह, माध्यमाची हाताळणी
आणि त्यावरील प्रभुत्व, हे दीर्घकाळ केलेल्या अभ्यासाने
साध्य होते हे सर्वमान्य आहे.
ही कलाकाराची उपलब्धी (Acheivement) आहे.
पण आपण बाह्यजगात जे काही पाहतो, अनुभवतो
त्यापेक्षाही अधिक मोठे विश्व आपल्या अंतर्मनात
सामावलेले असते. ते अप्रकट विश्व
कलाकार कलाकृतीच्या रूपात साकार करत असतो.
ही प्रस्तुती वास्तववादी (Realistic) किंवा
केवलाकारी (Abstract) अशी कोणत्याही स्वरूपाची
असू शकते. ते खरे त्याचे योगदान असते.''

ज्योत्स्ना प्रकाशन
www.jyotsnaprakashan.com




₹ १२५/-